सहाय्यक निबंधक सहकारी संस्था गट-ब या सवंर्गातून उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गात तदर्थ स्वरुपात पदोन्नती व पदस्थापना- श्री. शंकर कुंभार

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन आदेश क्रमांक - राजस-२०२३/प्र.क्र.१००/५स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ मे, २०२३

**शासन आदेश :-**

सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील सहाय्यक निबंधक सहकारी संस्था गट-ब  या संवर्गातून उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गात  एस-२० रु.५६१००-१७७५०० या वेतनश्रेणीत सन २०२२-२०२३ च्या तदर्थ निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. सदर पदोन्नतीनंतर उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री.शंकर कुंभार, सहायक निबंधक सहकारी संस्था,शिरुर, ता.शिरुर, जि.पुणे. | अमरावती | जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, अमरावती या रिक्त पदावर |

२. उपरोक्त पदोन्नत अधिकाऱ्यांची सदर पदोन्नती व पदस्थापना खालील नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून तदर्थ स्वरुपात करण्यात येत आहे :-

(१) मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून सरळसेवेच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५/५/२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.७/५/२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर दिनांक ७/५/२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

(२) सरळसेवा कोट्यातील रिक्त झालेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही ११ महिने किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवार उपलब्ध होतील यापैकी आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध झाल्यास तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यास पदावनत करण्यात येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियम) नियमावली २०२१ मधील २ (ड) येथील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्ती होणाऱ्या अधिकाऱ्यांनी सदर पदोन्नतीचे आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये पदोन्नतीच्या पदावर रुजू होणे आवश्यक आहे.

४. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

५. सदर अधिकारी पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यापूर्वी संबंधित अधिकाऱ्यांकडून त्यांना तदर्थ स्वरुपात देण्यात आलेल्या पदावर पदोन्नतीचा हक्क राहणार नसल्याचे लेखी बंधपत्र सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेऊन तदनंतर रितसर कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात यावेत.

६. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील असे पहावे व सदर अधिकारी विहित मुदतीत पदस्थापनेच्या जागी रूजू होतील याची दक्षता घ्यावी. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२/६/२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील तदतूदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केल्याची खातरजमा देखील करावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०५२३१३०६१५७४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.05.23 13:06:41 +05'30'

**(अनिल चौधरी)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
३.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
४.आयुक्त, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
५.संबधीत विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (प्रशासन व लेखापरिक्षण), व्दारा सहकार
६.महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता).
७.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
८.मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९.मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.संबधित अधिकारी, व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक.
१२.सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.
१३.निवड नस्ती (कार्यासन-५-स).